राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत (RKVY) राज्यातील खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे व कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे हा प्रकल्प सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीपीएस १११७/प्र.क्र.११६ /१७अे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ ऑगस्ट, २०१७

**वाचा-**

१) राकृवियो कक्षांचे क्रमांक आरकेव्ही ०३१७/प्र.क्र.१४ / राकृवियो कक्ष दि. ०९ जून, २०१७ चे राज्यस्तरीय मंजूरी समितीचे इतिवृत्त कृषि आयुक्तालयाचे क्र. जा.क्र. कृउसंप्र/राकृवियो-२०१७/गुनि-६/न.क्र.७९/ २८७/२०१७ दि. १५ जून, २०१७ चे पत्र.

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भात दिनांक २५ मे, २०१७ रोजी झालेल्या " राज्यस्तरीय मंजूरी समीतीच्या" बैठकीत (बीज परिक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे) व किडनाशके उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे या करीता सन २०१७-१८ या वर्षासाठी रुपये ४३५.०० लाख रकमेचा प्रकल्प राज्यात राबविण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे. त्यापैकी राज्यातील खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणेसाठी रु.१००.०० लाख व कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटी करणे करिता रु. १००.०० लाख असा एकुण रु. २००.०० लक्ष रकमेचा कार्यक्रम सन २०१७-१८ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय :-**

राज्यात पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व कोल्हापूर येथे खत नियंत्रण प्रयोगशाळा व पुणे, ठाणे, औरंगाबाद व अमरावती येथे ४ किटकनाशक प्रयोगशाळा मिळून एकूण ९ प्रयोगशाळा कार्यरत आहेत. या प्रयोगशाळांचे एन.ए.बी.एल मानांकन कायम राखणे, गौण बांधकामे करणे, नवीन तंत्रज्ञानाची अद्यावत उपकरणे प्रयोगशाळांना उपलब्ध करुन देणे, उपयोगात असलेल्या उपकरणांची देखभाल व दुरुस्ती करणे, प्रमाणित संदर्भिय रसायने, कॉलम, उपकरणे खरेदी करणे, प्रयोगशाळेतील अधिका-यांना उपकरणे हाताळणी तसेच विश्लेषकांचे विश्लेषणाबाबतचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील अद्यावत प्रशिक्षण देणे, एन.ए.बी.एल. मानांकन प्राप्त करणेसाठी या प्रयोगशाळेत संबंधित संस्थांनी विहित केल्याप्रमाणे सुविधा निर्माण करणे, तसेच एन.ए.बी.एल. असेसर ऑडीट शुल्क, इत्यादीकरिता सन २०१७-१८ मध्ये रु.२००.०० लक्ष (रुपये दोनशे लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चासह प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मांन्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पाचे भौतिक व आर्थीक लक्ष्य खालीलप्रमाणे राहील :-

**अ) खत नियंत्रण प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे**

| अ.क्र. | बाब | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष (रुपये लाख) |
|---|---|---|---|
| १ | गौण बांधकाम, वॉटर प्रुफिंग, नुतनीकरण व इलेक्ट्रीफिकेशन | प्रयोगशाळा ५ | ४.०० |
| २ | एनएबीएल नोंदणी शुल्क /प्रशिक्षण | प्रयोगशाळा ५ | ७.०० |
| ३ | विशेष सुट्टे भागाव्दारे उपकरणांची क्षमतावृध्दी करणे, गौण उपकरणे खरेदी करणे, प्रमाणित संदर्भीय रसायने, प्रायमर्स, व्हॅलीडेशन परफॉरमन्स, कॅलीब्रशेन, रेफरन्स बुक, एएमसी, सीएमसी आणि देखभाल इ. | प्रयोगशाळा ५ | ६४.०० |
| ४ | प्रशासकीय खर्च १ टक्का | प्रयोगशाळा ५ | १.०० |
| ५ | उपकरण खरेदी (आयुक्तालय स्तर) | प्रयोगशाळा ५ | २४.०० |
| | | एकूण | १००.०० |

**ब) कीटकनाशक चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे**

| अ.क्र. | बाब | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष (रुपये लाख) |
|---|---|---|---|
| १ | गौण बांधकाम, वॉटर प्रुफिंग, नुतनीकरण व इलेक्ट्रीफिकेशन | प्रयोगशाळा ४ | १.०० |
| २ | तपासणी नमुन्यांच्या शिल्लक भागांची विल्हेवाट लावणे. | प्रयोगशाळा ४ | १.०० |
| ३ | एनएबीएल नोंदणी शुल्क/प्रशिक्षण | प्रयोगशाळा ४ | ४.०० |
| ४ | विशेष सुट्टे भागाव्दारे उपकरणांची क्षमतावृध्दी करणे, गौण उपकरणे खरेदी करणे, प्रमाणित संदर्भीय रसायने, प्रायमर्स, व्हॅलीडेशन परफॉरमन्स, कॅलीब्रशेन, रेफरन्स बुक, एएमसी, सीएमसी आणि देखभाल इ. | प्रयोगशाळा ४ | ४४.०० |
| ५ | प्रशासकीय खर्च १ टक्का | प्रयोगशाळा ४ | १.०० |
| ६ | उपकरण खरेदी (आयुक्तालय स्तर) | प्रयोगशाळा ४ | ४९.०० |
| | | एकूण | १००.०० |

३. वरील निधी खर्च करण्यास संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे संबंधित अधिकाऱ्यांना वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेंचा, आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहीत मुदतीत केंद्र शासनाला, तसेच, राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी. त्याचप्रमाणे चालू वित्तीय वर्ष संपुष्टात आल्यानंतर तात्काळ उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) न चुकता शासनाला सादर करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११७५९२८२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2017.08.31 17:50:10 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक
२) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४) सहसचिव ( निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व कृषि संचालक /कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
८) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) वित्त विभाग- (व्यय-१/अर्थसंकल्प -१३)
११) नियोजन विभाग (कार्यासन १४३१),
१२) कक्ष अधिकारी (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष (RKVY), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती.